**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील रस्ते व इमारतींच्या संबंधाने घडणा-या दुर्घटना व उल्लेखनिय घटनांबाबत तातडीने वरिष्ठ अधिका-यांना व शासनास अहवाल सादर करण्याबाबत कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण २०१७/प्र.क्र.३१२ /रस्ते-१.**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३/०८/२०१७.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीत राज्यातील रस्त्यांची व इमारतींचे बांधकाम करणे तसेच या दोन्ही बाबीबाबत दुरूस्ती व देखभालीची कामे हाताळण्याची जबाबदारी आहे. विभागामार्फत या संदर्भाने आवश्यक कार्यवाही करण्यात येते. विभागाच्या अखत्यारीतील रस्त्यांच्या व इमारतींच्या संबधाने उल्लेखनिय घटना/दुर्घटना घडत असतात. यामध्ये प्रामुख्याने रस्ते, मोठे पुल व इमारतीची कामे पुर्ण होणे, त्याचे उद्घाटन महनिय व्यक्तींच्या हातून होणे, काही कामांचे भुमीपुजन होणे, काही कामे वेळेआधीच पुर्ण होणे, रस्ता खचण्यामुळे बंद पडणे अथवा वाहतुक बंद होणे, अतिवृष्टीमुळे पुल वाहुन जाणे, रस्त्यावर अतिवृष्टीमुळे मोठया प्रमाणात खड्डे पडणे, मो-या वाहून जाणे, इमारती कोसळणे इत्यादी बाबींचा समावेश आहे. तथापि अशा बाबी घडल्यानंतर त्वरेने या संबंधात आवश्यक माहिती व अहवाल शासनास तसेच वरीष्ठ अधिका-यांना सध्याच्या माहिती व तंत्रज्ञान युगात सर्व प्रकारची संपर्क साधने उपलब्ध असुनही तात्काळ सादर केला जात नाही. त्यामुळे या घटना संदर्भात शासनाकडे विचारणा झाल्यास कोणतीही माहिती उपलब्ध नसल्याने मोठया अडचणींच्या परिस्थितीस सामोरे जावे लागते. या दिरंगाई व दुलर्क्षामुळे शासनाची व विभागाची प्रतिमाही मलीन होते.

अश्या बाबीची पुनरावृत्ती होऊ नये यास्तव शासन पुढील प्रमाणे कार्यपध्दती निश्चित करीत आहे. अशा दुर्घटना अथवा उल्लेखनिय घटना घडल्यानंतर सर्व क्षेत्रिय अधिका-यांनी पुढील प्रमाणे कार्यवाही करणे क्रमप्राप्त राहील.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील अधिका-याच्या कार्यक्षेत्रात पुढील प्रकारच्या अथवा तत्सम घटना घडल्यास उदा.

१. नवीन इमारतींचे /रस्त्याचे/पुलाचे बांधकाम पुर्ण होऊन उद्घाटन होणे.
२. अस्तित्वातील इमारती/रस्ते/पुल यांच्यासाठी नवीन सुविधा उपलब्ध करण्याचे काम अथवा मुळ स्वरुपाच्या मोठया दुरूस्तीचे काम पुर्ण होणे.

३. विभागाच्या अधिकार क्षेत्रातील कर्मचा-यांना चांगल्या कामाबाबत पुरस्कार प्राप्त होणे.

४. दुर्घटना होऊन इमारती कोसळणे.

५. दुर्घटना होऊन रस्ता अथवा पुल निकामी होणे किंवा अतिवृष्टीमुळे वाहून जाणे

६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखाली येणा-या रस्ते, पूल व इमारती संबंधाने कोणत्याही दुर्घटनेमध्ये जिवितहानी होणे.

७. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखाली येणा-या रस्ते, पूल व इमारती संबंधाने कोणत्याही दुर्घटनेमध्ये मोठया प्रमाणात वित्त हानी होणे.

८. वृत्तपत्रे अथवा वृत्तवाहिन्यांवर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखाली येणा-या रस्ते, पूल व इमारती संबंधाने कोणत्याही बाबीबाबत बातम्या प्रसिध्द होणे.

वर नमुद प्रकारच्या किंवा अन्य महत्वाच्या घटना घडल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी पुढीलप्रमाणे अहवाल सादर करणे आवश्यक आहे.

१. अशा घटना घडल्यानंतर संबंधीत उप अभियंता/कार्यकारी अभियंत्याव्दारे SMS व्दारे १ तासाच्या आत सचिव (रस्ते), सचिव (बांधकामे), उप सचिव (रस्ते), उप सचिव ( इमारती), उप सचिव (रा.म.) यांना कळविण्यात यावे. या अधिका-यांचे मोबाईल क्रमांक, लॅडलाईन क्रमांक व ई-मेल पत्ता पुढील प्रमाणे आहे.

| **अ. क्र.** | **पद** | **लॅन्ड लाईन क्रमांक** | **ई-मेल पत्ता** | **मोबाईल क्रमांक** |
|---|---|---|---|---|
| **१.** | मा. मंत्री (सा.बां.) | ०२२-२२०२४७५१ | cbpatil.minister@gmail.com. | |
| **२.** | मा. राज्यमंत्री (सा. बां.) | ०२२-२२०२२९२४ | ppotepatil301@gmail.com. | |
| **३.** | प्रधान सचिव | ०२२-२२०२६६१२ | psec.pwd@maharashtra.gov.in | |
| ४. | सचिव (रस्ते) | ०२२-२२०२०१४९ | sec.pwdroads@maharashtra.gov.in | ९९७०९४५४४४ |
| ५. | सचिव (बांधकामे) | ०२२-२२०२४८०० | sec.pwdworks@maharashtra.gov.in | ९८२२७३६२८५ |
| ६. | उप सचिव (रस्ते) | ०२२-२२०२३००१ | dsrd.pwd@maharashtra.gov.in | ९४२०६९१९४३ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७. | उप सचिव (इमारती) | ०२२-२२८२६९२२ | dsbld.pwd@maharashtra.gov.in | ८१०८१९००४४ |
| ८. | उप सचिव (रा.म.) | ०२२-२२०२३००१ | dsnh.pwd@maharashtra.gov.in | ९७६७३७६३९९ |

उपरोक्त अधिकारी बदलुन गेल्यास नवीन अधिकार ग्रहण करणा-या अधिका-यांचे भ्रमणध्वनी क्रमांक प्राप्त करुन घ्यावे.

२. अशा उल्लेखनीय घटना/दुर्घटना घडणा-या कार्यक्षेत्राशी संबंधीत उप अभियंता/कार्यकारी अभियंता यांनी घटने संबंधाने फोटोग्राफ्स व सविस्तर तपशील दर्शविणा-या कागदपत्रासह अहवाल वर क्रमांक १ मध्ये नमुद अधिका-यांना १२ तासाच्या आत सादर करावेत. या संबंधाने हार्ड कॉपीमध्ये अहवाल त्याच दिवशी स्पीड पोस्ट अथवा विशेष दुतामार्फत शासनाकडे सादर करावा.

३. अशा उल्लेखनीय घटनांची/दुर्घटनांची संबंधीत अधीक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांनी या घटने संबंधाने प्रसिध्द झालेल्या वृत्ताच्या स्पष्टीकरणासह घटनेसंबंधाने सविस्तर अहवाल ई-मेल व्दारे मा. मंत्री (सा. बां.), मा. राज्यमंत्री (सा.बां.) प्रधान सचिव (सा. बां.), सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांना सादर करावा. तसेच दुरध्वनीव्दारे अहवाल संबंधीतांना प्राप्त झाल्याची स्वत: खात्री करावी.

४. वरील प्रमाणे कार्यवाही न करणा-या अधिका-यां विरुध्द प्रशासकीय कारवाई करण्यात येईल.

उपरोक्त सुचनाप्रमाणे कार्यवाही करण्याबाबत सर्व क्षेत्रिय अधिका-यांनी दक्ष रहावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०८२३११५८३७७९१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb818845016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.08.23 11:48:47 +05'30'

**( प्रकाश इंगोले )**
**उप सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
२) सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ.

३) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
४) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा. बां.) प्रादेशिक विभाग, नवी मुंबई
५) मुख्य अभियंता, विद्युत (सा. बां. ) प्रादेशिक विभाग, मुंबई
६) अधीक्षक अभियंता विद्युत/ कार्यकारी अभियंता विद्युत
७) मुख्य वास्तु शास्त्रज्ञ मुंबई/उप मुख्य वास्तु शास्त्रज्ञ, मुंबई
८) संचालक वने व उपवने
९) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
१०) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी)
११) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद विभाग.
१२) सर्व तांत्रिक अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.